**बळीराजा जलसंजीवनी योजनेतील NIDA अंतर्गत कर्ज मंजूर केलेल्या जलसंपदा विभागाच्या ६८ सिंचन प्रकल्पांवर देखरेख (MONITORING) करण्यासाठी समन्वय अधिकारी (Nodal Officer) म्हणून कार्यकारी अभियंता, वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे यांची नियुक्ती करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकिर्ण २०२१/प्र.क्र.१८०/निवसं-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक **:** १८ एप्रिल, २०२२.

वाचा :-१) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक नाबार्ड-२०१८/प्र.क्र.७८/अर्थबळ दि.३.४.२०१९.
२) जलसंपदा विभाग शासन परिपत्रक क्र.संकिर्ण २०२१/प्र.क्र.१८०/निवसं-१ दि.२.२.२०२२

## परिपत्रक

जलसंपदा विभागाचे शासन परिपत्रक क्र.संकिर्ण २०२१/प्र.क्र.१८०/निवसं-१ दि.२.२.२०२२ अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. विदर्भ व मराठवाड्यातील आत्महत्याग्रस्त जिल्ह्यातील व उर्वरीत महाराष्ट्रातील दुष्काळग्रस्त जिल्ह्यातील जलसंपदा विभागाच्या ९१ सिंचन प्रकल्पांना विशेष पॅकेज अंतर्गत केंद्रिय अर्थसहाय्य देण्यास केंद्र शासनाने दि.३० जुलै, २०१८ च्या ज्ञापनान्वये मंजूरी दिलेली आहे. त्यानुसार राज्यातील ९१ सिंचन प्रकल्प पूर्ण करण्यासाठी केंद्र शासनाने दिलेल्या विशेष पॅकेजच्या योजनेस दि.१.१.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये "बळीराजा जलसंजीवनी योजना" असे संबोधण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या दि.३.४.२०१९ च्या शासन निर्णयान्वये नाबार्डने बळीराजा जलसंजीवनी योजनेतील जलसंपदा विभागाच्या ६८ प्रकल्पांना सदर योजनेंतर्गत **NIDA (Nabard Infrastructure Develpoment Assistance)** अंतर्गत मंजूर केलेल्या रू.६६५५.०० कोटी रकमेचे कर्ज राज्य शासनाने स्विकारार्ह ठरविले आहे.

४. वित्त विभागाच्या दि.३.४.२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.२ मध्ये कर्जाच्या बाबतीत नोडल ऑफीसर म्हणून "सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे" यांची नियुक्ती केली असून मुद्दा क्र.१.५ मध्ये नाबार्डकडून प्राप्त होणाऱ्या उपरोक्त कर्जाच्या समन्वयासाठी उप सचिव (निवसं १) हे नोडल अधिकारी म्हणून काम पाहतील असे नमूद केले आहे.

५. सद्यस्थितीत बळीराजा जलसंजीवनी योजनेत अंतर्भूत असलेल्या राज्यातील ९१ प्रकल्पांच्या संदर्भात केंद्र शासनास प्रतिपूर्ती दावे (Reimbursement Claims) सादर करणे, प्रकल्पांचा मासिक, त्रैमासिक प्रगती अहवाल केंद्र शासनास सादर करणे इ. कामे AIBP Cell पुणे यांचेमार्फत केली जातात. नाबार्डचे विभागीय कार्यालय व AIBP चे कार्यालय ही दोन्ही कार्यालये पुणे येथेच आहेत.

६. सबब प्रशासकीय सोयीच्या दृष्टिने जलसंपदा विभागांतर्गत नाबार्ड अर्थसहाय्यित बळीराजा जलसंजीवनी योजनेतील प्रकल्पांना **NIDA** अंतर्गत कर्ज मंजूर केलेल्या ६८ सिंचन प्रकल्पांचे MONITORING करण्यासाठी "समन्वय अधिकारी"(Nodal Officer) म्हणून **कार्यकारी अभियंता, वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे यांची नियुक्ती** करण्यात येत आहे.

७. समन्वय अधिकारी (Nodal Officer) यांच्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये खालीलप्रमाणे राहतील:

१) क्षेत्रीय स्तरावरील कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंबंधीची सर्व जबाबदारी समन्वय अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे यांची राहील.

२) बळीराजा जलसंजीवनी योजनेतील **NIDA** अंतर्गत कर्ज मंजूर केलेल्या प्रकल्पांचे DRAWAL APPLICATION प्राथम्याने सादर करण्याची जबाबदारी समन्वय अधिकारी यांची राहील.

३) तसेच प्रकल्पांच्या काम पूर्णत्वाचे प्रमाणपत्र (Completion Certificate) शासनास त्वरीत सादर करण्याची जबाबदारी समन्वय अधिकारी यांची राहील.

८. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०४१८१७०२४३९७२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAILA BABAN YADAV

Digitally signed by SHAILA BABAN YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a022aa350b02721b783553b5f04e9a637bb746c09f7ca3701d55e5feb1b5b141, pseudonym=D9E9BF2549554875691C6300C3F682524A1406B3, serialNumber=01B315F80D517C9B1A66011D10F7F68624DB9044C98A741CFD0A1AEF85A9F714, cn=SHAILA BABAN YADAV
Date: 2022.04.18 17:05:15 +05'30'

**( शैला ब. यादव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.अपर मुख्य सचिव, (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२.प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३.सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४.सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५.सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे.
६.मुख्य अभियंता तथा समन्वय अधिकारी, जलसंपदा विभाग, सिंचन सेवा भवन, सिव्हिल लाईन्स,नागपूर.
७.मुख्य अभियंता (जसं/पा./दवप्र) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८.आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उपसचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कार्यकारी अभियंता, वेगवर्धित सिंचन लाभ विशेष पथक, पुणे.
११.कक्ष अधिकारी (अर्थबळ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवसं-१ कार्यासन संग्रहार्थ.